महिला व बाल विकास विभागाअंतर्गत स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविण्यात येत असलेल्या अनुदानित संस्थांमधील दरडोई अनुदानात वाढ करणेबाबत...

२००४०७१९१६०४४६००१-२५०७

महाराष्ट्र शासन
महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक :-संकीर्ण-२००२/प्र.क्र.१४७/का-३
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १ जुलै, २००३

**वाचा** :- शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. जेजेए-१०९४/प्र.क्र.४०/सुधार-३, दि.१५.१२.१९९४

**प्रस्तावना** :- महिला व बाल विकास विभागाअंतर्गत स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविण्यात येत असलेल्या अनुदानित संस्थांमधील प्रवेशितांना सध्या दरमहा दरडोई रु.५००/- इतके परिरक्षण अनुदान देण्यात येत आहे. यापैकी रु.४५०/- प्रवेशितांचे अन्न, वस्त्र, तेल, स्टेशनरी, शिक्षण, व्यावसायिक प्रशिक्षण, कर्मचाऱ्यांचे वेतन, मनोरंजन, वीज, पाणी आकार इ. बाबींवर आणि रु.५०/- इतका निधी इमारत भाडे, औषधी व प्रसाधन साहित्य यावर खर्च करण्यात येतो. याचिका क्र. ११०७/१९९६ प्रकरणी उच्च न्यायालयाने परिरक्षण अनुदानाची रक्कम ही केवळ प्रवेशितांच्या अन्न, वस्त्र व इतर गरजा भागविण्यासाठी वापरण्यात यावी, प्रशासकीय बाबींवर वापरण्यात येऊ नये असे निर्देश दिलेले आहेत. त्यानुसार परिरक्षण अनुदान पध्दतीत बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**निर्णय** :- शासनाने खाली नमूद केलेल्या सर्व प्रकारच्या अनुदानित निवासी संस्थांपैकी ज्या संस्थांमधील कर्मचाऱ्यांना वेतन व इतर प्रशासकीय बाबींकरीता स्वतंत्रपणे अनुदान दिले जात आहे त्या संस्थांच्या अनुदान पध्दतीत बदल केलेला नाही. इतर संस्थांपैकी एड्सग्रस्त व मतिमंद मुलांकरीता कार्यरत संस्थांना व त्या व्यतिरिक्त कार्यरत संस्थांना अनुक्रमे एकूण रु.९००/- व रु.७५०/- इतके अनुदान दि. १ एप्रिल, २००३ पासून लागू करण्यास शासन मंजूरी देत आहे. यामध्ये वेतन, आकस्मिक खर्च, इमारत भाडे, वीज, पाणी आकार व इतर प्रशासकीय बाबींसाठी रु.२५०/- याप्रमाणे अनुदानाचा समावेश आहे. उर्वरित रु. ६५०/- व रु.५००/- ही अनुदानाची रक्कम केवळ प्रवेशितांच्या अन्न, वस्त्र व इतर गरजा भागविण्यासाठी वापरण्यात यावी.

| अ.क्र | संस्थेचा प्रकार | लेखाशीर्ष |
|---|---|---|
| १ | बालगृह, निरिक्षणगृह, विशेषगृह, अनुरक्षण गृह, बालसदन, बालकाश्रम, अनाथालये | मागणी क्र.एक्स-१ २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण-०२- समाज कल्याण, १०२-बाल कल्याण, दोन (०२) जपणूक व संरक्षणाची गरज असलेल्या मुलांसाठी संस्था चालविणाऱ्या स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदाने. (२२३५ ३०४ १) |

| | | |
|---|---|---|
| २ | बालगृह, निरिक्षणगृह, विशेषगृह, अनुरक्षण गृह, बालसदन, बालकाश्रम, अनाथालये | मागणी क्र.एक्स-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण-०२-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०५) (०२) निराश्रित बालकांसाठी संस्थेत्तर सेवा (४) सहाय्यक अनुदान. ( २२३५ ११४ ७) |
| ३ | महिलांसाठी आधारगृहे | मागणी क्र.एक्स-१ २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण-०२-महिला व बाल कल्याण-१०३- महिला कल्याण, (२) (ए) आधारगृहे चालविण्यासाठी स्वयंसेवी संस्थांना सहाय्य-४१ सहाय्यक अनुदान (२२३५ १२८ २) |
| ४ | देवदासींच्या मुला मुलींसाठी वसतिगृहे | मागणी क्र.एक्स-१ २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण-०२-महिला व बाल कल्याण-१०३-महिला कल्याण, (९) (ए) देवदासींच्या पुनर्वसनाच्या योजना (२२३५ १८५ ३) |

एड्सग्रस्त व मतिमंद मुलांकरीता कार्य करणाऱ्या संस्थांसाठी दरमहा दरडोई रु. ६५०/- व त्या व्यतिरिक्त कार्यरत संस्थांसाठी दरमहा दरडोई रु. ५००/- या परिपोषण अनुदानातून कोणत्याही संस्थांनी कर्मचारी वेतनावर व प्रशासकीय बाबींवर खर्च करु नये.

२. प्रत्येक वर्षी ग्राहक मूल्यात होणाऱ्या बदलानुसार परिरक्षण अनुदानाचा दर सुधारण्यात येईल.

३. वर नमूद केलेल्या बाबींवरील दि. १ एप्रिल २००३ पासूनचा खर्च त्या त्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २००३-२००४ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा. याकरीता आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी वरील आदेश सर्व संबंधितांच्या नजरेस त्वरित आणावेत.

५. सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ५०३/ ०३/ व्यय-१४/ दि.१३.६.२००३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(चंद्रसेन तुरकर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
विभागीय अधिकारी तथा सहाय्यक संचालक (सआयो) मुंबई.
सर्व विभागीय अधिकारी तथा बाल विकास प्रकल्प अधिकारी, पुणे/ नाशिक / औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर
सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी
सर्व जिल्हाधिकारी
मुख्य अधिकारी, चिल्ड्रेन एड सोसायटी, मुंबई.